राज्यातील “ग्रामपंचायती” तसेच “क” वर्ग नगरपालिका यांना गौण खनिजावरील स्वामित्वधनाच्या मिळकतीतून अनुदान देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांकः गौखनि-१०/०६१६/प्र.क्र. ४०९/ख
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ११ एप्रिल, २०१७.

पहा :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. MMR १०८१/१३३४-G-७ दि. १६.१.१९८५.

२) महाराष्ट्र खनिज विकास (निर्मिती व उपयोजन) निधी अधिनियम, २००१.

३) केंद्र शासन खाण व खनिजे (विकास व विनियमन) (सुधारणा) अधिनियम, २०१५.

४) केंद्र शासन राष्ट्रीय खनिज शोध न्यास नियम, २०१५.

५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाची अधिसूचना क्र. MDF-०६१५/C.R. ३४/Ind-९ दि. १ सप्टेंबर, २०१६.

प्रस्तावना:-

संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील ग्रामपंचायतीं तसेच “क” वर्ग नगरपरिषदा यांचे उत्पन्नाचे स्त्रोत वाढावे यासाठी ग्रामपंचायतींना आणि “क” वर्ग नगरपरिषदा यांना त्यांच्या हद्दीतून उत्खनन केलेल्या गौण खनिजावरील स्वामित्वधनाच्या रक्कमे एवढे वार्षिक सहाय्यक अनुदान रु. एक लाखाच्या मर्यादेत प्रदान करण्याची तरतूद करण्यात आली आहे. संदर्भाधीन क्रमांक २ येथील, महाराष्ट्र खनिज विकास (निर्मिती व उपयोजन) निधी अधिनियम, २००१ अन्वये, खनिजावरील स्वामीत्वधनापासून प्राप्त महसूलाच्या १०% रक्कम "खनिज विकास निधी" मध्ये जमा करण्याची तरतूद करण्यात आली असून, सदर निधीच्या वाटपासंबंधी नियम तयार करण्यात आले होते. संदर्भाधीन क्रमांक ३ येथील अधिनियमातील तरतुदीच्या अनुषंगाने केंद्र शासनाने राष्ट्रीय खनिज शोध न्यास स्थापन करण्याकामी राष्ट्रीय खनिज शोध न्यास नियम २०१५ राजपत्रात दि. १४.८.२०१५ रोजी अधिसूचित केले आहेत. तसेच खाण व खनिजे (विकास व विनियमन) अधिनियम १९५७ मध्ये संदर्भ क्र. ३ वरील सुधारणा अधिनियमान्वये समाविष्ट करण्यात आलेल्या कलम ९ (ब) (१) मध्ये "जिल्हा खनिज प्रतिष्ठान" स्थापन करण्याची तरतूद करण्यात आली असून, सदर तरतूदीनुसार उद्योग, उर्जा व कामगार विभागाने संदर्भाधीन क्र. ५ येथील अधिसूचनेन्वये महाराष्ट्र जिल्हा खनिज प्रतिष्ठान नियम, २०१६ राजपत्रात प्रसिध्द केले आहेत. याबाबी विचारात घेऊन, राज्य शासनाकडून गौण खनिजावरील स्वामित्वधनातून ग्रामपंचायतींना व “क” वर्ग नगरपरिषदांना निधी देण्यात एकसुत्रता व एकवाक्यता आणण्याच्या दृष्टीने संदर्भाधीन दिनांक १६.१.१९८५ चा शासन निर्णय निरसित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

गौण खनिजाच्या स्वामित्वधनाच्या रकमेतून ग्रामपंचायतींना व "क" वर्ग नगरपरिषदांना खनिकर्मामुळे बाधित झालेल्या क्षेत्राच्या विकासाकरिता द्यावयाच्या निधीमध्ये एकसुत्रता व एकवाक्यता आणण्याकरिता शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक MMR १०८१/१३३४-G-७, दि. १६.१.१९८५ याद्वारे निरसित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने (त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २६३/२०१६/व्यय-९, दिनांक १३.१०.२०१६ अनुसार) निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१११७४८२४८३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Kshirsagar

Digitally signed by Rajendra Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e673df1a1f6243d932fcb8679fc8cd85d90c614 95ae8b4592f8dcc5b8a851a8, cn=Rajendra Kshirsagar
Date: 2017.04.12 16:39:26 +05'30'

**(राजेंद्र क्षीरसागर)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई (पत्राने)
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) सर्व मंत्रालयीन विभाग,
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) सर्व जिल्हाधिकारी,
८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
९) सर्व “क” वर्ग नगरपालिकांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१०) प्रधान मुख्यवनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
१२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०.

१३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०

१४) प्रधान महालेखापाल -२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.

१५) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र राज्य, नागपूर.

१६) कक्ष अधिकारी, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग (उद्योग-९ कार्यासन), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

१७) कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग (का.क्र.वित्त-२), मंत्रालय, मुंबई.

१८) वित्त विभाग, (व्यय-९/ अर्थसंकल्प -३/१४) मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

१९) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

२०) निवडनस्ती “ख” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

***********